GR 200510181224200001

**गोपनीय**

विभागीय चौकशी प्रकरणांमध्ये चौकशी प्राधिका–याकडे चौकशीसाठी प्रकरण सोपविताना दस्तऐवज व संबंधित कागदपत्रे सादर करण्याबाबत –
विलंब वा टाळाटाळ करणा–या अधिका–याविरूध्द शिस्तभंगाची कारवाई करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक: सीडीआर–1896/प्र.क्र.6/96/11अ,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 20 एप्रिल, 1996.

**वाचा** :– (1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक–1185/2233/42/11, दिनांक 24 डिसेंबर, 1985.

(2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सीडीआर/1190/377/प्र.क्र.13/11अ, दिनांक 15 मे, 1990.

(2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सीडीआर–1691/प्र.क्र.149/91/11अ, दिनांक 5 जानेवारी, 1993.

**परिपत्रक** :– विभागीय चौकशांची प्रकरणे त्वरेने निकालात काढण्यासाठी शिस्तभंग विषयक प्राधिकारी तसेच चौकशी अधिकारी यांनी कोणती काळजी घ्यावी याबाबतच्या सूचना संदर्भाधीन शासकीय परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. तथापि, त्यांचे अनुपालन योग्य रीतीने न झाल्यामुळे विभागीय चौकशा दीर्घकाळ प्रलंबित राहतात. काही विभागीय चौकशी प्रकरणांमध्ये चौकशी अधिका–यांची नियुक्ती करण्यात आल्यानंतरही चौकशी–संबंधातील दस्तऐवज व मूळ कागदपत्र चौकशी अधिका–यांकडे पाठविण्यामध्ये विलंब केला जातो वा टाळाटाळ केली जाते असे निदर्शनास आले आहे. परिणामी चौकशी अधिका–यांना चौकशीचे कामकाज सुरू करता येत नाही. केवळ कागदपत्रांच्या अभावी चौकशीचे कामकाज रेंगाळावे ही फार गंभीर बाब आहे. दस्तऐवज व मूळ कागदपत्र उपलब्ध करून देणे ही शिस्तभंग विषयक प्राधिकरणाची जबाबदारी आहे, व ती वेळीच पार पाडणे आवश्यक आहे.

2. पंचायत राज समितीच्या 1991–92 व 1992–93 तेराव्या अनुपालन अहवालामध्ये या संदर्भात खालील–प्रमाणे अभिप्राय नमूद केले आहेत:-

"चौकशी अधिका–याकडे दस्तऐवज व संबंधित कागदपत्रे सादर करण्याची ज्या अधिका–यावर जबाबदारी आहे अशा अधिका–याकडून दस्तऐवज व कागदपत्रे सादर करण्यामध्ये विलंब वा टाळाटाळ करण्यात येत आहे असे निदर्शनास आले तर अशा अधिका–यांविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात यावी. कागदपत्रे व दस्तऐवज उशिरा मिळाल्यामुळे चौकशीसाठी विलंब होण्याचे प्रकार यापुढे कटाक्षाने टाळण्यात यावेत."

3. पंचायत राज समितीच्या वरील शिफारशीनुसार शासन असे आदेश देत आहे की, विभागीय चौकशी प्रकरणा–मध्ये सविस्तर चौकशी करण्यासाठी जेव्हा महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम,1979 मधील नियम 8(5) नुसार चौकशी प्राधिका–याची नियुक्ती केली जाते, तेव्हा चौकशी प्राधिका–याच्या नियुक्तीनंतर लगेचच व जास्तीत जास्त 30 दिवसांच्या कालावधीत चौकशी प्रकरणाच्या अनुषंगाने संबंधित असलेला सर्व दस्तऐवज व मूळ कागदपत्रे चौकशी प्राधिका–याकडे पाठविण्यात यावीत. चौकशी अधिका–याकडे दस्तऐवज व संबंधित कागदपत्रे सादर करण्याची ज्या अधिका–यावर जबाबदारी आहे अशा अधिका–याकडून दस्तऐवज व कागदपत्रे सादर करण्यामध्ये विलंब वा टाळाटाळ करण्यात येत आहे असे निदर्शनास आले तर अशा अधिका–याविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात यावी.

4. सर्व शिस्तभंगाविषयक प्राधिकरणांनी आदेशांची नोंद घ्यावी व त्यांचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रा. द. कासार,
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग.

प्रति,

1. राज्यपालांचे सचिव, मुंबई,
2. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुंबई,
3. मुख्य सचिव व शासनाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
4. सर्व विभागीय आयुक्त,
5. सर्व जिल्हाधिकारी,
6. सर्व प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा,
7. सर्व जिल्हा चौकशी अधिकारी, विभागीय चौकशा,
8. सर्व सादरकर्ता अधिकारी,
9. मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
10. सर्व मंत्रालयीन विभाग,
11. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
12. निवड नस्ती.

---